राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे दिंडवी, (ता. एटापल्ली,जि.गडचिरोली )या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१६१५/प्र.क्र.४८/पापु-१३**

**मंत्रालय,मुंबई-४०००३२**

**तारीख: १० ऑगस्ट, २०१५**

**वाचा -**

१) शासन निर्णय ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.०९/१०/२०१३.

२) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

३) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.

४) शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७,दि.१७/१०/२०१४

५) शासन परिपत्रक क्र.ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७,दि.१६/०२/२०१५

६) शासन निर्णय ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७,दि.२०/०२/२०१५

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली यांचे पत्र क्र.जिपग/ग्रापापु/तांशा-३/३४३०/२०१४,दि.२६/१२/२०१४ व.क्र.जिपग/ग्रापापु/तांशा-३/६४५/२०१५, दिनांक २३/०३/२०१५ रोजीचे पत्र

८) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७,दि.१५/०६/२०१५.

९) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालयाचे पत्र क्र.पापुशा/प्र.क्र.१६६/२०१५/वासो-०१, दिनांक १३/०७/२०१५.

**प्रस्तावना -**

मौजे दिंडवी,(ता.एटापल्ली,जि.गडचिरोली) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.४२,८८,०९७/- किंमतीच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,गडचिरोली यांनी दि.०३/११/२०१४ रोजी तांत्रिक मान्यता दिली आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च रु.४,४६२/- हा जिल्हा परिषदेच्या विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव गडचिरोली जिल्हा परिषदेने संदर्भाधिन अनु क्र.७ मधील पत्रान्वये शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. त्यामुळे वाढीव दरडोई खर्च असलेल्या मौजे दिंडवी,(ता.एटापल्ली,जि.गडचिरोली) या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

**मौजे दिंडवी,(ता.एटापल्ली,जि.गडचिरोली)** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.४,४५४/-** एवढया दरडोई खर्च असलेल्या योजनेस **रु.४२,८०,०९७ /- ( अक्षरी रुपये बेचाळीस लक्ष ऐंशी हजार सत्त्याण्णव फक्त )** इतक्या **ढोबळ** किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास **प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे. (निव्वळ किंमतीत विद्युत जोडणीसाठी असलेली रु.२,००,०००/- च्या तरतुदीवर देखील ई.टी.पी. आकारण्यात आला असल्याने तो वगळल्याने योजनेची किंमत बदलली आहे.)

२. संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयाद्वारा ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे.

**३. सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१. **संदर्भ क्र.९ येथील शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील.**

२. सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी. योजना पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, यांची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती **ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती / संदर्भाधिन अनु.क्र.४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे** करण्यात यावी.

३. योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

४. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने किमान **रु.१२००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी पाणीपट्टी निश्चित करावी व त्यात टप्प्याने वाढ करावी (प्रस्तुत योजनेच्या पाणी पट्टीदरात वाढ करण्याऐवजी सदर योजनेचा वार्षिक भार हा प्रकल्पित वर्षासाठी प्रस्तावित असलेल्या पाणीपट्टीद्वारा भागेल एवढयापर्यत कमी करणेत यावा). सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, गडचिरोली यांनी स्वत: करावी.** योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही

५. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

६. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७. गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

९. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे करु नये. (उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतर योजनेतील इतर कामे हाती घेण्यात यावीत.)

१०.जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे कार्यादेश देण्यात येऊ नये.

११.अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

१२.योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१३.सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र.२ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पुर्तता करण्यात यावी.

१४.ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणी संदर्भात वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार तसेच संदर्भ क्र.९ येथील शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली यांची राहील.

**४.** या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणा-या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा. राज्य हिश्याची तरतूद राज्यस्तर तसेच जिल्हा परिषद, गडचिरोली यांनी त्यांना जिल्हा नियोजन समितीमार्फत उपलब्ध होण्याऱ्या निधीमधून करण्यात यावी.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०७१०२४४९१०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.08.10 15:24:03 +05'30'

**(सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव,मंत्रालय मुंबई
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
५. प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई.
६. विभागीय आयुक्त,नागपूर विभाग,नागपुर.
७. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).

८. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
९. सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
१०.जिल्हाधिकारी, गडचिरोली.
११.संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, गडचिरोली.
१३.संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१४.मुख्य अभियंता,मजीप्रा,प्रादेशिक विभाग,नागपूर.
१५.जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जिल्हा गडचिरोली.
१६.अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ,कार्यालय चंद्रपूर/नागपूर
१७.कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, गडचिरोली.
१८. मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१९.कार्यासन पापु-४, ६, ७, ९, १०,१७, १८ व पापु-२० पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय.
२०.निवडनस्ती पापु-१३, पा.पु.व स्व.वि.मंत्रालय, मुंबई.